**एशियन डेव्हलपमेंट बँक अर्थसहाय्यित शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणे तसेच धुप प्रतिबंधक उपाययोजना ही जिल्हा स्तरीय योजना राज्य स्तरीय योजना म्हणून परिवर्तित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक पीएलएन १२०९/प्र. क्र. २४९/ बंदरे-२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. २६ ऑक्टोबर, २०१०.**

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्याला ७२० किमी लांबीचा समुद्रकिनारा लाभलेला आहे. त्यापैकी ४०० किमी समुद्रकिनारा हा नैसर्गिकरित्या संरक्षित असून उर्वरित ३२० किमी. किनारपट्टी धुपप्रवण आहे. या ३२० किमी. पैकी आतापर्यंत १४२ किमी. समुद्रकिनारा हा किनारी अभियंता यांचेमार्फत धुप प्रतिबंधक बंधारे बांधून संरक्षित करण्यात आला असून १७८ किमी. धुपप्रवण किनारा सुरक्षित करणे गरजेचे आहे. त्याकरीता राज्याच्या साधनसामुग्री व्यतिरिक्त निधीची पर्यायी व्यवस्था करणे आवश्यक होते.

२. महाराष्ट्र, गोवा व कर्नाटक या राज्यातील किनारपट्टीचे धुप होण्यापासून संरक्षण करण्यासाठी जलसंधारण मंत्रालय,भारत सरकार यांनी एशियन डेव्हलपमेंट बँकेकडे सहाय्याची मागणी केली होती. त्याअनुषंगाने ADB ने तांत्रीक सल्लागारांची नियुक्ती केली असून त्यासाठी १ दशलक्ष डॉलर्स (रु. ५ कोटी) चे अर्थसहाय्य दिले आहे. सदर नियुक्त सल्लागारांनी राज्याच्या किनारपट्टीचा अभ्यास करुन मिऱ्या - बे, ता. जि. रत्नागिरी येथील किनारपट्टीवर पथदर्शी प्रकल्प तयार केला आहे.

राज्यामध्ये हा प्रकल्प सन २०१० ते सन २०१९ या कालावधीत ३ टप्प्यांमध्ये राबविण्यात येणार असून त्याकरीता MFF (Multitranch Financing Facility) तत्वावर कर्जपुरवठा होणार आहे. या प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यामध्ये सन २०१० ते सन २०१३ या कालावधीत मिऱ्या-बे, ता. जि. रत्नागिरी येथील पथदर्शी प्रकल्प राबविण्यात येणार असून दुसरा व तिसरा टप्पा सन २०१३ ते सन २०१९ या कालावधीत राबविण्याचे प्रस्तावित आहे. या प्रकल्पामध्ये समुद्र धुप प्रतिबंधक पारंपारीक उपाय योजनांऐवजी Soft Solutions चा वापर करण्यात येणार असून दगडी बंधाऱ्यांव्यतिरिक्त जिओ-ट्युब, तिवरांची लागवड, ड्युन मॅनेजमेंट यासारख्या उपाययोजना हाती घेण्यात येणार आहेत.

३. या प्रकल्पाच्या वित्तिय आकृतिबंधानुसार एडिबीचा हिस्सा ९६.१२ दशलक्ष डॉलर्स (रु. ४८०.०० कोटी), महाराष्ट्र शासनाचा हिस्सा ५३.०८ दशलक्ष डॉलर्स (रु. २६५.०० कोटी) व खाजगी क्षेत्राचा हिस्सा १६.२२ दशलक्ष डॉलर्स (रु. ८१.०० कोटी) असा राहणार असून एकूण प्रकल्पाची अंदाजित किंमत रु. ८२७ कोटी (१६५.४२ डॉलर्स) अशी आहे.

प्रस्तुत प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यासाठी एडिबीचा हिस्सा १०.०५ दशलक्ष डॉलर्स (रु. ५०.०० कोटी) व राज्य शासनाचा हिस्सा ४.३७ दशलक्ष डॉलर्स (रु. २२.०० कोटी) असून पहिल्या टप्प्याची एकूण किंमत१४.४२ दशलक्ष डॉलर्स (रु. ७२.०० कोटी) अशी राहणार आहे.

४. पहिल्या टप्प्यामधील पथदर्शी प्रकल्प सन २०१० ते सन २०१३ या कालावधीत राबविण्यात येणार असून यामध्ये पुढील बाबींचा समावेश आहे :-

अ) मिऱ्या-बे च्या उत्तरेस सागरी तळाशी ३६० मी. लांबीची Offshore Submerged Cup Shaped Geotextile Reef (जिओट्युब) टाकणे.

ब) मिऱ्या बे च्या उत्तरेकडील किनाऱ्यावर वाळूच्या सहाय्याने किनाऱ्याचे संवर्धन (Beach Nourishment) करणे व

क) तांत्रिक सल्लागारांकडून राज्यातील उर्वरित धुपप्रवण किनाऱ्यांचा अभ्यास करुन धुप प्रतिबंधक उपाययोजनांचे प्रकल्प तयार करणे.

तसेच, प्रकल्पाचा दुसरा व तिसरा टप्पा सन २०१३ ते सन २०१९ या कालावधीत हाती घेण्यात येणार असून त्यामध्ये पुढील बाबींचा समावेश आहे : -

अ) मिरकरवाडा मासेमारी बंदराचा विकास व सुधारणा - यामध्ये माल हाताळणी क्षमता वाढविणे, शीतगृहे, बर्फ कारखाने यांचा विकास करणे समाविष्ट आहे.

ब) रत्नागिरी येथील भगवती बंदराजवळील ब्रेक वॉटरची लांबी वाढविण्यासाठी आवश्यक तो तांत्रिक अभ्यास करणे व

क) प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात तयार करण्यात आलेल्या कामांची अंमलबजावणी करणे या कामांचा समावेश आहे.

५. या प्रकल्पांतर्गत हाती घेण्यात येणाऱ्या धुप प्रतिबंधक उपाय योजनांमुळे खालीलप्रमाणे लाभ होणे अपेक्षित आहे :-

(अ) जमीनीची धुप थांबून समुद्र किनाऱ्याचे संवर्धन (Beach Nourishment),
(ब) शेती व घरांचे संरक्षण,
(क) मिरकरवाडा मत्स्य बंदरांमध्ये गाळ साचण्याची प्रक्रीया थांबून बंदराची उपयुक्तता वाढणे,
(ड) माशांच्या वस्तीस्थानासाठी उपयुक्त वातावरण तयार होवून मत्स्य प्रजननामध्ये वाढ होणे,
(इ) किनाऱ्याचे संवर्धन झाल्यामुळे पर्यटनाच्या संधीमध्ये वाढ होणे व
(फ) मासेमारी नौकांना बंदर कायम उपलब्ध होणार असल्यामुळे मासेमारीच्या प्रमाणात वाढ होणे.

६. या प्रकल्पाचे सर्व व्यवस्थापन व अंमलबजावणी यासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड ही राज्य अंमलबजावणी यंत्रणा (State Executing Agency) राहणार असून प्रकल्पाच्या दैनंदिन कामकाजासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डातंर्गत प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात येणार आहे.

७. या प्रकल्पाच्या प्रस्तावास CWPRS, MCZMA, MoEF, DoE, DEA यांची मंजूरी प्राप्त झाली असून प्रकल्पाच्या कर्जविषयक वाटाघाटीनंतर एशियन डेव्हलपमेंट बँक, केंद्र शासन व राज्य शासन यांच्यातील त्रिपक्षीय कराराच्या मसुद्यास दि. ३१.८.२०१० रोजी नवी दिल्ली येथे झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे.

८. या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत तसेच धुप प्रतिबंधक उपाययोजना ही जिल्हास्तरीय योजना राज्यस्तरीय योजना म्हणून राबविण्यास मान्यता देण्याबाबत प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या दि. ८.९.२०१० रोजी झालेल्या बैठकीत विचारार्थ सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

१) राज्याच्या समुद्र किनारपट्टीवरील जिल्ह्यांमध्ये ADB अर्थसहाय्यीत शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प, सन २०१० ते २०१९ या कालावधीत राबविण्यास व त्यासाठी एकूण रु.८२७.०० कोटी इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्यात येत आहे. यापैकी रु. ४८०.६० कोटी ADB चे कर्ज, रु.२६५.४० कोटी राज्य शासन व रु. ८१ कोटी खाजगी क्षेत्राचा वाटा राहील.

२) समुद्र धुपप्रतिबंधक उपाययोजना ही जिल्हास्तरीय योजना, दि. १.४.२०११ पासून राज्यस्तरीय योजना म्हणून परिवर्तीत करण्यात येत असून ही योजना गृह विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात येत आहे.

३) या प्रकल्पाकरीता राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु. २६५.४० कोटी निधी, ही योजना जिल्हास्तरीय ऐवजी राज्यस्तरीय योजना म्हणून राबविण्यात येणार असल्यामुळे दरवर्षी ६ जिल्हयांसाठी प्राप्त होणारी सरासरी तरतुद रु.४० कोटी ही राज्यस्तरावर वळती करुन ९ वर्षांच्या प्रकल्प कालावधींसाठी अंदाजित एकूण रु. ३६० कोटी इतक्या अनुदानामधुन उपलब्ध करण्यात यावा.

४) या प्रकल्पाकरीता खाजगी क्षेत्राच्या सहभागापोटी जर तसा सहभाग खाजगी क्षेत्राकडून प्राप्त न झाल्यास रु.८१.०० कोटी इतका निधी, सन २०११ ते २०१९ या ८ वर्षाच्या कालावधीत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या स्वनिधीतुन उपलब्ध करण्यात यावा.

५) प्रकल्पखर्च रु. ८२७.०० कोटी पैकी ADB मार्फत केंद्र शासनाकडून मिळणाऱ्या रु.४८०.६० कोटी इतक्या कर्जाची व्याजासह परतफेड, राज्य शासनाने २५ वर्षाच्या कालावधीत करण्यास व या कर्जास राज्य शासनाची हमी मिळण्यास मान्यता देण्यात येत आहे. वरील कर्जाची व्याजासह परतफेड राज्य शासन व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्या अंतर्गत कराराव्दारे करण्यास मान्यता देण्यात येत असून याबाबत राज्य शासनाचा निर्णय महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास बंधनकारक राहील.

६) ADB पुरस्कृत शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी विशिष्ट तांत्रिक अर्हता असलेली १५ संवर्गातील पदे कंत्राटी स्वरुपात, प्रकल्प कालावधीसाठी भरण्यास, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास मान्यता देण्यात येत आहे.

७) मत्स्यव्यवसाय विभागाची कामे व धुपप्रतिबंधक उपाययोजना या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक असलेली तांत्रिक व अतांत्रिक अशी एकूण ३७ पदे प्रथमतः किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अधिपत्याखालील पदांमधून प्रतिनियुक्तीने / वर्ग करुन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, ही पदे कालांतराने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या आस्थापनेवर निर्माण करुन आवश्यकतेनुसार भरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८) मत्स्यव्यवसाय विभागाची महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत होणारी कामे पार पाडण्यासाठी लागणाऱ्या तांत्रिक व अतांत्रिक अधिकारी / कर्मचारी यांचे वेतन-भत्ते, वाहन भत्ते, कार्यालयीन इमारत भाडे, कार्यालयीन खर्च, पी. एम. सी. ची नियुक्ती इ. करीता लागणारा निधी मत्स्यव्यवसाय विभागाच्या कामांवर होणाऱ्या भांडवली खर्चावर १०% सेंटेज चार्जेस आकारुन भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

९) प्रस्तुत प्रकल्पाच्या कार्यान्वयनाची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्याकडे सोपविण्यात आली असल्याने या प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तुत मंत्रीमंडळ निर्णयाच्या अनुषंगाने विविध यंत्रणांसोबत आवश्यक करारनामे स्वाक्षांकित करण्यास तसेच प्रकल्पातील समाविष्ट असलेल्या सर्व कामांना प्रशासकीय मान्यता देण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय राज्य मंत्रीमंडळाने दि. ८.९.२०१० रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(प्र. ता. गौड)**
**सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), १/२, मुंबई / नागपूर,
महालेखापाल महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई / नागपूर,
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय,
प्रधान सचिव (वित्त /व्यय), वित्त विभाग, मंत्रालय,
सचिव (मत्स्यव्यवसाय), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, सीबीडी, बेलापूर, नवी मुंबई,
किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा माळा, चेतना महाविद्यालयाजवळ, बांद्रा (पु), मुंबई.
जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ, ठाणे / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग
निवडनस्ती (बंदरे-२), गृह विभाग,

---------